**महाराष्ट्र राज्यातील पर्यटनासाठी जम्मू काश्मिर येथे गेलेल्या पर्यटकांना, पेहेलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यानंतर राज्यात परत आणण्यासाठीच्या विमान प्रवासाची देयके अदा करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**

**शासन ज्ञापन क्रमांक : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.८९ (भाग-१)/म-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ एप्रिल, २०२५

**संदर्भ :**१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९/म-३,दि.२३.०४.२०२५.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९(भाग-१)/म-३,दि.२४.०४.२०२५.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.पुनर्वि-२०२४/२२३५/प्र.क्र.३६/ब-१, दि.२४.०४.२०२५

**ज्ञापन**:-

महाराष्ट्र राज्यातील विविध जिल्ह्यांतील काही पर्यटक जम्मू काश्मिर राज्यातील पेहेलगाम येथे पर्यटनासाठी गेले होते. दि.२२.०४.२०२५ रोजी पेहेलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यानंतर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार **विशेष बाब** म्हणून त्यांना महाराष्ट्रात परत आणण्यासाठीच्या विमान प्रवासाचा खर्च शासनाने करण्याबाबतचा निर्णय घेतलेला आहे.

२. त्यास अनुसरुन गिरीकंद ट्रॅव्हलर्स प्रा.लि. यांनी मदत व पुनर्वसन विभागास पाठविण्यात आलेले देयक क्र.MS२५/२६३, दि.२४.०४.२०२५ अन्वये पर्यटकांच्या विमान प्रवासखर्चाप्रीत्यर्थ एकूण रु.३८,६१,०४०/- (रुपये अक्षरी अडतीस लक्ष एकसष्ट हजार चाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या देयकाची मागणी केली आहे. या ज्ञापनान्वये रु.३८,६१,०४०/- (रुपये अक्षरी अडतीस लक्ष एकसष्ट हजार चाळीस फक्त) इतक्या खर्चास व निधी वितरणास मंजूरी देण्यात येत आहे.

३. याबाबत होणारा खर्च, मागणी क्र.सी-५, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण ६० इतर सामाजिक सुरक्षा कल्याण कार्यक्रम- २०० इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (०१) (०५) दहशतवादी हल्ल्यात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (अनिवार्य) (सशर्त), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५बी३८१) या लेखाशिर्षाखाली पुर्नविनियोजनाव्दारे/ उणे (-) प्राधिकाराप्रमाणे उपलब्ध अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. यासाठी, लेखा अधिकारी आव्यप्र-६ यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव तथा वित्तीय सल्लागार यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदरचे आदेश महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९(भाग-१)/म-३, दि.२४.०४.२०२५ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२५१८२०२९१११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2025.04.25 18:21:27 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी अग्रेषित**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त/नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
७) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल १/२, (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
९) मा.अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०) सबंधित जिल्हाधिकारी
११) संबंधित जिल्हा अधिदान अधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-९/) मंत्रालय, मुंबई
१३) कार्यासन ब-१, म-११, म-७ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (म-३)